**वन विभागांतर्गत वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर शासकीय अधिकारी यांचे सेवा पुनर्विलोकन करुन मुदतपुर्व सेवानिवृत्त करण्यासाठी विभागीय पुनर्विलोकन समिती / अभिवेदन समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र.एमएफएस-२०२०/प्र.क्र.१६/फ-८**

मादाम कामा मार्ग,हूतात्मा चौक

मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.

दिनांक - १० फेब्रुवारी २०२०.

<u>वाचा -</u> शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि.१० जून , २०१९.

<u>प्रस्तावना -</u>

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ मधील तरतुदीनुसार शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेची ३० वर्ष पुर्ण झाल्यानंतर त्यांची शासन सेवा पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता आजमाविण्यासाठी विहित निकषांच्या आधारे त्यांचे पुनर्विलोकन करुन, सुयोग्य व कार्यक्षम अधिकारी/ कर्मचारी यांनाच लोकहितास्तव शासन सेवेत पुढे चालू ठेवावे व अकार्यक्षम तसेच संशयास्पद सचोटी असणाऱ्या अधिकारी/ कर्मचारी यांना शासन सेवेतून मुदतपुर्व सेवानिवृत्त करावे, असे शासनाचे धोरण आहे.

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दि.१० जुन २०१९ अन्वये, वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे सेवा पुनर्विलोकन करुन मुदतपुर्व सेवानिवृत्त करण्याबाबत एकत्रित कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. यामध्ये शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे पुनर्विलोकन करण्याकरीता **विभागीय पुनर्विलोकन समिती** तसेच सेवा पुनर्विलोकनाअंती सेवा पुढे चालु ठेवण्यास अपात्र ठरलेल्या नोटीस बजावण्यात आलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्या अभिवेदनावर विचार करण्याकरीता **विभागीय अभिवेदन समिती** गठीत करण्याबाबत आदेशित करण्यात आलेले आहे. त्यास अनुसरून वन विभागांतर्गत विभागीय पुनर्विलोकन समिती तसेच विभागीय अभिवेदन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, वन विभागांतर्गत वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे/ अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षानंतर शासकीय अधिकारी यांचे सेवा पुनर्विलोकन करण्यासाठी खालील प्रमाणे **विभागीय पुनर्विलोकन समिती** गठीत करण्यात करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे वर्गीकरण | विभागीय पुनर्विलोकन समिती |
|---|---|---|
| १) | गट-अ (राजपत्रित) (अतिकालिक वरिष्ठ श्रेणी) ग्रेड वेतन १०००० व त्यावरील | १) **अध्यक्ष-** सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (वने)<br>२) **सदस्य-** सह सचिव (वने) (आस्थापना)<br>३) **सदस्य-** सहसचिव /मुख्य वनसंरक्षक,मंत्रालय<br>४) **सदस्य सचिव-** अवर सचिव / कार्यासन अधिकारी (फ-८ /फ-४). |
| २) | गट-अ (राजपत्रित) (वरिष्ठ श्रेणी) ग्रेड वेतन ७६०० व त्यापेक्षा अधिक तथापि १०००० पेक्षा कमी | |
| ३) | गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी | |
| ४) | गट-ब (राजपत्रित) | |

उपरोक्त अ.क्र.१, २ व ३ येथील नमूद पदांच्या बाबतीत अवर सचिव / कार्यासन अधिकारी (फ-८) तसेच अ.क्र.४ येथील नमूद पदांच्या बाबतीत अवर सचिव / कार्यासन अधिकारी (फ-४ ) हे सदस्य सचिव राहतील.

**२.** तसेच सेवा पुनर्विलोकनाअंती सेवा पुढे चालु ठेवण्यास अपात्र ठरलेल्या नोटीस बजावण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या अभिवेदनावर विचार करण्याकरीता वन विभागातंर्गत खालील प्रमाणे **अभिवेदन समिती गठीत** करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे वर्गीकरण | अभिवेदन समिती |
|---|---|---|
| १) | गट-अ (राजपत्रित) (कनिष्ठ वेतनश्रेणी) ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी | १) **अध्यक्ष-** सचिव/ प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (वने)<br>२) **सदस्य-** सह/ उप सचिव (वने)<br>३) **सदस्य सचिव-** अवर सचिव / कार्यासन अधिकारी (फ-८ /फ-४). |
| २) | गट-ब (राजपत्रित) | |

वरील समितीतील अ.क्र.२ येथील सदस्य हे पुनर्विलोकन समितीच्या सदस्यांव्यतिरीक्त असतील. उपरोक्त अ.क्र.१ येथील नमूद पदांच्या बाबतीत अवर सचिव / कार्यासन अधिकारी (फ- ४) तसेच अ.क्र.२ येथील नमूद पदांच्या बाबतीत अवर सचिव / कार्यासन अधिकारी (फ-८ ) हे सदस्य सचिव राहतील.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२००२१०१२३४३८२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2020.02.10 12:35:38 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर
६. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (सर्व)
७. मुख्य वनसंरक्षक (प्रा.),सर्व
८. उप वनसंरक्षक (प्रा.),सर्व
९. विभागीय वन अधिकारी (सर्व)
१०.संचालक,वन प्रशिक्षण संस्था (सर्व)
११.मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१२.मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१३.प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१४.कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग ( कार्यास्न - फ-४)
१५.निवड नस्ती (फ-८ कार्यासन).